वितरण आदेश क्र.१३
सन २०१६-१७

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
सहाय्यक अनुदान २०१६-२०१७ योजनेतर
(३१ सहायक अनुदाने वेतनेतर) (अंतिम हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१६/प्र.क्र.७९ /१६/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०१७

वाचा : १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८०/अर्थ - ३, दि.१ एप्रिल, २०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०११६/प्र.क्र.५२/ २०१६/२५, दिनांक ६ एप्रिल, २०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०१६/प्र.क्र.५२/ २०१६/२५, दि.२२ एप्रिल, २०१६.
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.यशदा-२०१६/प्र.क्र.७९/१६/१२-अ, दि.१२ मे, २०१६.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.यशदा-२०१६/प्र.क्र.७९/१६/१२-अ, दि.२ ऑगस्ट, २०१६.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेच्या २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये रु.६००.०० लाख **( अक्षरी रुपये सहाशे लाख फक्त )** इतकी तरतूद केली असून ,संदर्भाधीन क्र.६ च्या शासन परिपत्रकानुसार मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीनुसार वेतनेतरकरिता ८० % च्या मर्यादेत निधी योजनेतर खर्चासाठी मंजूर करण्यात आला होता. त्यास अनुसरुन या संस्थेला संदर्भाधीन क्रमांक ५ व ६ च्या शासन निर्णयान्वये, योजनेतर (वेतनेतर) खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क) म्हणून रु. ४८०.०० लाख (अक्षरी रुपये चारशे ऐंशी लाख फक्त) इतके सहाय्यक अनुदान वितरित करण्यात आले होते.

२. आता वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.७ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ९०% च्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. तथापि सुधारित अंदाज सन २०१६-१७ साठी यशदा संस्थेस योजनेतर (वेतनेतर) खर्चासाठी १००% निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर रु.१५० लाख वितरित करण्याकरिता उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

३. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेला आता योजनेतर खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क) एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या १००% निधी वेतनेतरकरिता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले उर्वरित रु.१२० लाख (अक्षरी रुपये एकशे वीस लाख फक्त) इतके सहायक अनुदान (अंतिम हप्ता) मंजूर करण्यात येत आहे.

४. हा खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण (००)(०६) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यास सहाय्यक अनुदान (योजनेतर) (२०७० ०५३२) -३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" याखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान यशदा, पुणे या संस्थेने संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आर्थिक वर्ष २०१६-१७ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

७. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

८. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. यशदा, पुणे या संस्थेच आहरण व संवितरण अधिकारी (कोड क्र.२२०१०००१२१) यांनी संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या सहायक अनुदानाची रक्कम रु.१२० लाख (अक्षरी रुपये एकशे वीस लाख फक्त) आहरित करावी.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेचत्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१८१३१३५५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2017.03.30 18:15:14 +05'30'

**( अजित देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
४. महासंचालक, यशदा, पुणे.
५. लेखाधिकारी, यशदा, पुणे. (२ जादा प्रतींसह).
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा) , मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. उप कोषागार कार्यालय, पुणे.
९. वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसंकल्प ३व १४ ), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र.२५, मुंबई - ३२.
११.निवड नस्ती.